**सन २०१५ मधील पावसाळयापासून स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांच्या आवारात वृक्षारोपणाचा कार्यक्रम हाती घेताना वन/ सामाजिक वनीकरणामार्फत रु.३ /- प्रती रोप दराने रोपांचा पुरवठा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.वनम-२०१५/प्र.क्र.६३/फ-११**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २२ जुलै, २०१५

**वाचा: -**

१) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र. एसएलएफ-१४९३/प्र.क्र.२२/जल-१४, दि. ६.१०.१९९७
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. वनम-२०१५/प्र.क्र.४३/फ-११, दि.३०.५.२०१५
३) शासन पत्र क्र. नवीन योजना-२०१५/प्र.क्र.४६/फ-११, दि. २२.६.२०१५ अन्वये निर्गमित इतिवृत्त.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-१(२)/१११८/२०१५-१६, दि. १४.७.२०१५
५) शासन परिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. संकीर्ण-१११५/प्र.क्र.२५५/एस.एम.१, दि.१५.७.२०१५

**प्रस्तावना :**

जागतिक तापमानातील वाढ (Global Warming) आणि हवामानातील बदल (Climatic Change) याबाबत जागतिक स्तरावर मोठ्या प्रमाणात विचारमंथन सुरु झाले आहे. महाराष्ट्रात वनाच्छादन भौगोलिक क्षेत्राच्या २० टक्केच्या जवळपास आहे. पर्यावरण संतुलन आणि समतोल राखणे आणि टिकविण्यासाठी हे प्रमाण कमीत कमी ३३ टक्के पर्यंत असणे गरजेचे आहे. त्यासाठी राज्यामध्ये मोठ्या प्रमाणात वृक्ष लागवड करुन त्यातून हरित महाराष्ट्राची संकल्पना प्रत्यक्षात आणणे अत्यंत आवश्यक आहे. त्याचबरोबर ग्रामीण आणि शहरी भागातील वायु, ध्वनी आणि जल प्रदूषणाची तीव्रता कमी करण्यासाठी उपलब्ध जागांवर वृक्ष लागवड आणि उद्यानांची निर्मिती करुन जैवविविधतेचे (Bio-Diversity) संवर्धन करणे गरजेचे आहे.

उपरोक्त बाबींचा विचार करता ग्रामीण आणि नागरी भागांमधील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांच्या परिसरामध्ये वृक्ष लागवडीची योजना मान्सून २०१५ पासून प्रथम टप्प्यात कार्यान्वित करण्याबाबत संदर्भ क्र.३ येथील पत्राच्या अनुषंगाने संदर्भ क्र.५ येथे नमूद परिपत्रकान्वये घेण्यात आला आहे. या परिपत्रकानुसार या योजनेच्या अंमलबजावणीबाबत संदर्भ क्र.५ येथे नमूद परिपत्रकाद्वारे राज्यातील सर्व शाळांना सविस्तर सूचना दिल्या आहेत.

त्यानुसार स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये वृक्षारोपण कार्यक्रम राबविण्यासाठी प्रत्येक शाळेला २० मिश्ररोपांचे पॅकेज देण्याचे ठरले. तसेच सदर रोपे रु. ३.०० प्रती रोप या दराने वाटप करण्याबाबतचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे यांनी त्यांच्या संदर्भ क्र.४ नुसार शासनास सादर केला. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे या योजनेचे महत्त्व विचारात घेऊन स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये वृक्षारोपण कार्यक्रम राबविण्यासाठी प्रत्येक शाळेला २० मिश्ररोपांचे पॅकेज रु. ३.०० प्रती रोप या दराने वाहतूक करुन पुरवठा करण्याबाबतच्या प्रस्तावास शासन मान्यता देण्यात येत आहे.

संदर्भाधीन क्र.१ येथे नमूद शासन निर्णयातील मुद्दा क्र.५ मधील तरतुदीनुसार शाळा/महाविद्यालये इत्यादीसाठी रोपवाटिकेतून रोपे घेऊन जाण्याच्या सवलतीचा दर पिशवीतील रोपांसाठी रु.०.५० प्रती रोप असा आहे. तथापि, रु.३/- प्रती रोप या दराने, निवडलेल्या शाळांना रोपे पुरवठा करावयाची आहेत. त्यामध्ये रोपांच्या वाहतुकीवरील खर्च व वन / सामाजिक वनीकरण विभागाकडून शाळेतील विद्यार्थी व शिक्षकांना तांत्रिक मार्गदर्शन करण्यासाठी/ कार्यशाळा घेणे इत्यादीसाठी रु. २.५०/- प्रती रोप खर्च समावेश राहील. सबब, या योजनेसाठी विशेष बाब म्हणून रु. ३.०० प्रती रोप हा दर प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार त्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

शासनास या योजनेसाठी कोणताही जादा आर्थिक भार पडणार नाही. तसेच राज्यात वेगाने हरितीकरण होण्याच्या दृष्टीने आणि विद्यार्थ्यांमध्ये मोठया प्रमाणात पर्यावरणविषयक जनजागृती होण्यासाठी सदर प्रस्तावास शासन मान्यता देण्यात येत आहे. विषयांकित नमूद दर केवळ या योजनेच्या कालावधीकरीता लागू राहतील.

या योजने अंतर्गत करण्यात आलेल्या रोपांचा पुरवठा आणि लागवड याबाबतची माहिती खालील प्रपत्रातील क्र.१ ते ५ बाबतची माहिती दि. ३१.८.२०१५ पर्यंत शासनास सादर करावी. तसेच क्र. ६ येथील माहिती दि. ३१.१०.२०१५ आणि दि. ३१.५.२०१६ पर्यंत शासनास सादर करावी.

**प्रपत्र**

| प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे | सामाजिक वनीकरण वृत्त/ जिल्हा/ तालुका | सहभागी शाळांची एकूण संख्या | १५ ऑगस्ट रोजी लागवड रोपे संख्या | स्थापन केलेली पर्यावरण रक्षक सेना संख्या | जिवंत रोपांची संख्या मे/ऑक्टोबर | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. |
| | | | | | | |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२२१६०९०९९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.22 16:12:05 +05'30'

**(डी.एल. थोरात)**
**सह सचिव (वने)**

**प्रत :-**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा. मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव

३) सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव
४) सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर
६) महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) व्यवस्थापकीय संचालक, वन विकास महामंडळ मर्यादित, कडबी चौक, नागपूर
८) सर्व विभागीय आयुक्त
९) जिल्हाधिकारी (सर्व)
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
११) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१५) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद
१६) सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद
१७) सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१८) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक
१९) सर्व मुख्य वनसंरक्षक व उप महांसचालक, सामाजिक वनीकरण विभाग
२०) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक)
२१) सर्व वनसंरक्षक/उपवनसंरक्षक (प्रादेशिक)
२२) सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग
२३) विभागीय वन अधिकारी आणि प्रसिध्दी अधिकारी, वन विभाग, पुणे/नागपूर.
२४) महालेखापाल-१/२) लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२५) मा.मंत्री यांचे खाजगी सचिव (वित्त, नियोजन व वने)
२६) मा.मंत्री यांचे खाजगी सचिव (शालेय शिक्षण)
२७) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२८) सर्व कार्यासन, महसूल व वनविभाग (वनकक्ष)
२९) निवडनस्ती, फ-११ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.